**मान्यताप्राप्त अनुदानित संस्थामधील कर्मचाऱ्यांच्या वेतनाच्या अनुदानाची म.को.नि.-४४ नमुन्यातील देयके संगणक प्रणालीद्वारे करण्याबाबत .**

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**शासन परिपत्रक क्र: संकीर्ण- १०११/प्र. क्र.१००/कोषा प्र - ५,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
तारीख: ०७ मार्च, २०१५.

**परिपत्रक :-**

विविध प्रशासकीय विभागांच्या अधिपत्याखालील मान्यताप्राप्त अनुदानित संस्थांमधील कर्मचाऱ्यांच्या वेतनासाठी राज्य शासनाकडून अनुदान वितरीत करण्यात येते. या कर्मचाऱ्यांच्या वेतनासाठीची देयके महाराष्ट्र कोषागार नियमावलीतील नमुना-४४ मधे हस्तलिखीत स्वरुपात तयार करुन कोषागारात सादर करण्यात येतात.

सदर देयके तयार करण्यासाठी सेवार्थ प्रणालीचे कस्टमायझेशन करुन संगणकीय प्रणाली विकसित करण्यात आली आहे.

या प्रणालीचा वापर करुनच उपरोक्त देयके तयार करणे आवश्यक आहे.

वैद्यकीय शिक्षण विभाग, आदिवासी विकास विभाग, ग्राम विकास विभाग, सामाजिक न्याय विभाग, शालेय शिक्षण विभाग, कृषि विभाग आणि पशुसंवर्धन, दुग्ध विकास आणि मत्स्यव्यवसाय विभाग या विभागांच्या अधिपत्याखालील संस्थामधील कर्मचाऱ्यांची माहे मार्च, २०१५ ( एप्रिल २०१५ मध्ये देय ) पासून वेतनासाठी अनुदानाची देयके प्रणालीमार्फतच तयार करून कोषागारात सादर करावी.

तसेच उच्च व तंत्र शिक्षण विभागांच्या अधिपत्याखालील संस्थामधील कर्मचाऱ्यांची वेतन देयके नेमून दिलेल्या प्रणालीमार्फतच तयार करून माहे जून, २०१५ ( जुलै २०१५ मध्ये देय ) पासून कोषागारात सादर करावी.

विहित प्रणालीद्वारे तयार केलेल्या देयकांव्यतिरिक्त अन्य कोणत्याही प्रकारे तयार करण्यात आलेली महाराष्ट्र कोषागार नियम, १९६८ मधील नमूना क्रमांक ४४ मधील वेतन देयके कोषागारात स्वीकारण्यात येणार नाहीत. प्राप्त देयके संबंधित प्रणालीमार्फत तयार करण्यात आली आहेत अथवा नाही याबाबत कोषागार अधिकाऱ्यांनी त्यांना उपलब्ध करून दिलेल्या संकेतांकाद्वारे प्रणालीत प्रवेश करून खात्री करावी व तद्नंतर त्याबाबत पुढील कार्यवाही करावी.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक **२०१५०३०७१५३८२०४५०५** असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

NARAYAN BHASKAR RINGANE

Digitally signed by NARAYAN BHASKAR RINGANE
DN: CN = NARAYAN BHASKAR RINGANE, C = IN, S = Maharashtra, O = Government of Maharashtra, OU = Finance Department
Date: 2015.03.07 17:17:16 +05'30'

**ना.भा.रिंगणे**
उपसचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१.मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा / विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई.
२.सर्व सन्मानिय विधानसभा / विधान परिषद व संसद सदस्य,
३.राज्यपालांचे सचिव
४.मुख्यमंत्र्यांचे सचिव
५.सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
६.सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग
७.मंत्रालयीन सर्व विभागांच्या अधिन असलेल्या सर्व विभागांचे व कार्यालयांचे प्रमुख
८.प्रबंधक, मुळ न्यायालय शाखा, उच्च न्यायालय, मुंबई
९.प्रधान महालेखापाल (लेखा परीक्षा)- १, महाराष्ट्र, मुंबई
१०.प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई
११.महालेखापाल (लेखापरीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर
१२.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर
१३.आयुक्त, आयकर (TDS) चर्नीरोड, मुंबई ४००००२
१४.आयुक्त, आयकर (TDS) सिव्हील लाईन, नागपूर ४४४००१
१५.प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा) मुंबई
१६.सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
१७.सचिव, महाराष्ट्र विधीमंडळ सचिवालय, मुंबई
१८.प्रबंधक, लोक आयुक्त व उपलोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई
१९.प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई
२० मुख्य माहिती आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई

२१.विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली

२२.सर्व विभागीय आयुक्त

२३.सर्व जिल्हाधिकारी

२४.सर्व जिल्हापरिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी

२५.संचालक , लेखा व कोषागारे, मुंबई

२६.अधिदान व लेखाअधिकारी, मुंबई

२७.सहसंचालक,लेखा व कोषागारे,कोकण/पुणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक/ अमरावती

२८.मुख्य लेखापरीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई

२९.सहसंचालक,स्थानिक निधी लेखा मुंबई /पुणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक/अमरावती

३०.वित्त विभागातील सर्व कार्यासने

३१.निवड नस्ती कोषा प्र.५